राष्ट्रीय ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत चिंचोली माळी व १५ गावे ता. केज जि. बीड या वाढीव दरडोई खर्च असलेल्या प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः पापुयो - २०१९/प्र.क्र.१४/पापु १८

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२
तारीख: २८ जानेवारी, २०१९

**वाचा :-**

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांचे पत्र जा.क्र.ग्रापापुवि/ताशा/कावि/३७८५/२०१८, दिनांक ३१/१२/२०१८

२) शासन निर्णय क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र. १०४ (अ)/पापु-०७ दि. १७.०३.२०१०

३) शासन निर्णय क्र. ग्रापाधो-१२०८/प्र.क्र. ५२/पापु-०७ दि. ९.१०.२०१३

४) शासन निर्णय क्र. ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१५६/पापु-०७ दि. २२.०१.२०१४

५) शासन निर्णय क्र. ग्रापाधो-१११४/प्र.क्र. २२/पापु-०७ दि. ०९.०७.२०१४

६) शासन निर्णय क्र. ग्रापाधो१११४/प्र.क्र. ५२/पापु-०७ दि. १७.१०.२०१४

७) शासन निर्णय क्र. ग्रापाधो१११५/प्र.क्र. २२/पापु-०७ दि. १६.०२.२०१५

८) शासन निर्णय क्र. ग्रापाधो११११/प्र.क्र. १३४/पापु-०७ दि. २०.०२.२०१५

९) शासन निर्णय क्र. ग्रापाधो१११४/प्र.क्र.६१५२/पापु-०७ दि. १५.६.२०१५

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत चिंचोली माळी व १५ गावे ता. केज जि. बीड या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकिय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन पत्र क्र.१ अन्वये शासन मान्यतेसाठी सादर करण्यात आला आहे. सदर योजनेस मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद यांनी दि. २७.१२.२०१८ रोजी तांत्रिक मान्यता दिली आहे. तदनुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

चिंचोली माळी व १५ गावे या प्रादेशिक पाणी पुरवठा ता. केज जि. बीड नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ३१,८४,०८,१००/- (ढोबळ) (एकतीस कोटी चौ-यांशी लक्ष आठ हजार शंभर फक्त) एवढ्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बीड यांनी करावी. योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर किमान १ वर्ष योजनेची देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी कंत्राटदारावर राहील.

२) योजनेची कामे विहीत पद्वतीने ई- निवीदा मागविण्यात येऊन करावीत

३) योजनेसाठी आवश्यक भुसंपादन व इतर सर्व परवानग्या प्राप्त झाल्याशिवाय योजनेस कार्यारंभ आदेश देण्यात येऊ नयेत

४) योजनेची कामे मंजूर किंमतीत कालबद्व व नियोजनबद्वरीत्या टप्या-टप्पयाने पुर्ण करण्यात यावीत.

५) योजनेचा उदभव विकसित झाल्याशिवाय इतर कामे सुरु करु नयेत. उदभवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.

६) योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती चा खर्च भागविण्यासाठी व योजना आर्थिकदृष्टया स्वयंपूर्ण होण्याकरिता संबंधित ग्रामपंचायतीने घरगुती नळ धारकासाठी कितान पाणीपटटीचा दर निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी. या सर्व बाबी ग्रामपंचातीस देणे अंमलबजावणी यत्रणेच्या अधिका-याची जबाबदारी राहील.

७) योजना चालविणे, त्याचे परिक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुगी नुतनीकरणासाठी संबंधीत ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

८) अस्तित्वातील स्तांतांचे बळकटीकरण करण्यात यावे.

९) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

१०) शासनाच्या प्रचलित तरतुदीनुसार हागणदारी मुक्तीसंदर्भात कार्यवाही करण्यात यावे.

११) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच शासनाच्या प्रचलित धोरणानुसार योजनेचे त्रयस्त तांत्रिक परिक्षण करणे अनिवार्य राहील.

१२) योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने योजना पुर्णत्वाचा दाखला सक्षम प्राधिका-याकडे सादर करणे बंधनकारक राहील.

१३) योजनेच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरूपाची अनियमितता, अपहार तथा गैरव्यवहार बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.

१४) योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखले संबंधित अंमलबजावणी यंत्रणेकडून प्राप्त करून घेऊन शासनास सादर करण्याची जबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) यांची राहील.

१५) योजना प्रचलित धोरणानुसार राबविण्यात येत आहे याची दक्षता घ्यावी.

१६) ग्रामपंचायतीकडे विजबील थकबाकी असल्यास ती पुर्ण भरल्याशिवाय कार्यादेश देण्यात येऊ नये.

१७) पुर्वीच्या योजनेचे लेखे आर्थिकदृष्टया पुर्ण केले आहेत किंवा कसे ही बाब तपासणे संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील. लेखे पुर्ण करणे आवश्यक आहे.

१८) योजनेचा समावेश २०१८-१९ च्या वार्षिक कृती आराखडयात समाविष्ट आहे याची खात्री क्षेत्रिय स्तरावर करण्यात यावी.

१९) कार्यादेश देण्यापूर्वी योजनेच्या स्त्रोताबाबत/पाणी शाश्वतेबाबत मुख्य अभियंता यांनी अहवाल प्राप्त करून खात्री करावी.

२०) सदर योजनेत पाणीपटटी मोठया प्रमाणात वाढ आहे.याबाबत सर्व समाविष्ट गावातील लोकांकडून ८०% वसूलीबाबत हमीपत्र घेण्यात यावे.

२. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणाऱ्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या केंद्र तथा राज्य निधीतुन भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेताक २०१९०१२८१६०९०३२४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh
Sawairam
Rathod

Digitally signed by Suresh Sawairam Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e695ebef4b8a6c860bec48f3ef34f42f0c13f8d1aa06f854d5b9bd6874084124, serialNumber=bcaaf1242528ff3cdece2c8eb03929321c1c09c0a7c4d906e3b8a47677ad9769, cn=Suresh Sawairam Rathod
Date: 2019.01.28 16:18:28 +05'30'

**( सु.स.राठोड )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) जिल्हाधिकारी,बीड.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद
११) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद.
१२) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१३) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद.
१४) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बीङ.
१५) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बीड.
१६) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१८) कार्यासन (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१७ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१९) निवडनस्ती कार्यासन पापु-१८.